केंद्र शासन पुरस्कृत "बाल संरक्षण" कार्यक्रमाची अंमलबजावणी करणेबाबत...

200407191541566001-2500

महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०००/ प्र.क्र४२२/का-३
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :-२४ एप्रिल २००२.

**वाचा** :- केंद्र शासनाचे पत्र अ.शा.पत्र क्र. ४२०/ डि एस (एस.डी.) / २०००, दि. १ जून २०००.

**शासन निर्णय** :- केंद्र शासनाच्या उपरोक्त पत्रान्वये राज्यात "चाईल्ड लाईन इंडिया फाऊंडेशन" या स्वयंसेवी संस्थेच्या सहाय्याने 'बाल संरक्षण' (National Initiative for child Protection) हा कार्यक्रम संपूर्ण राज्यात राबविण्यास शासन मंजुरी देत आहे. सर्व विभागांनी "बाल संरक्षण" कार्यक्रमात सहभागी व्हावे.

२. बाल संरक्षण कार्यक्रमांतर्गत मुलांना त्यांचे हक्क व संरक्षण मिळवून देण्यासाठी निरनिराळ्या विभागांनी कार्यवाही करावयाची आहे. या योजनेची अंमलबजावणी करण्याकरीता चाईल्ड लाईन इंडिया फाऊंडेशन ही संस्था समन्वय संस्था म्हणून काम पाहिल. ही संस्था कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरीता प्रत्येक जिल्हयात एका स्वयंसेवी संस्थेची निवड करेल. त्या संस्थेचे क्षेत्र त्या जिल्हयापुरते मर्यादित राहील. जिल्हा स्तरावरील ही स्वयंसेवी संस्था मुलांना खालील सेवा सुविधा पुरविण्यास मदत करेल :-

१) मुलांच्या संरक्षणाकरीता संरक्षणगृहे / रात्र निवासी केंद्र सुरु करणे.

२) आपद्ग्रस्त बालकास हवी असलेली मदत दूरध्वनी क्र. १०९८ वर उपलब्ध करुन घेता येईल.

३) बालकांसाठी असलेल्या निरनिराळया योजनांची माहिती उपलब्ध करुन देणे.

४) बालकांसाठी उपलब्ध असलेल्या शिक्षण / कार्यक्रमाची माहिती काळजीवाहक संस्थांपर्यंत पोहोचविणे.

५) बालकांना वैद्यकिय सेवा सुविधा प्राधान्याने मिळवून देण्याचा प्रयत्न करणे.

६) गुन्हेगारी प्रवृत्तीकडे झुकत असलेल्या मुलांना व बालकांना गुन्हेगारी प्रवृत्तीपासून परावृत्त करणे.

३. ही योजना टप्याटप्याने सर्व जिल्हयात सुरु करण्यात यावी व ती कालांतराने तालुका पातळीपर्यंत विस्तारीत करण्यात यावी.

४. जिल्हयांमध्ये स्वयंसेवी संस्थांची निवड करुन वरील सेवा उपलब्ध करुन देण्याकरिता "चाईल्ड लाईन" या संस्थेने National Initiative for Protection या कार्यक्रमासाठी केंद्र शासनाकडून उपलब्ध होणारा निधी खर्च करावा. चाईल्ड लाईन या संस्थेने संपूर्ण राज्याचा आराखडा तयार करुन तो कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी खाली नमूद केलेल्या राज्यस्तरीय समितीपुढे मंजुरीसाठी सादर करावा. बाल विकास क्षेत्रात काम करणाऱ्या सर्व स्तरावरील शासकीय अधिकाऱ्यांना, कर्मचाऱ्यांना व स्वयंसेवी संस्थांना चाईल्ड लाईन तर्फे प्रशिक्षण देण्यात येईल. कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी राज्यस्तरावर चाईल्ड लाईन तर्फे कार्यशाळा आयोजित करण्यांत येईल.

५. बाल संरक्षण कार्यक्रमाचे संनियंत्रण एकात्मिक बाल विकास कार्यक्रमासाठी दि. ५ डिसेंबर, २००१ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेली शक्तीप्रदत्त समिती करेल. या समितीच्या बैठकीच्या वेळी बाल संरक्षण कार्यक्रमाकरीता युनिसेफचे प्रतिनिधी व आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना निमंत्रित करण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(वासुदेव ~~रोकडे~~)
सचिव

प्रति,
सर्व मंत्रालयीन विभागाचे प्रधान सचिव / सचिव.
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई.
चाईल्ड लाईन इंडिया फाऊंडेशन, नानाचौक, महानगरपालिका शाळा, दुसरा मजला, फ्रेरे ब्रिज, लो लेव्हल, नाना चौक, ग्रँड रोड स्टेशनजवळ, मुंबई - ४०० ००७.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व पोलिस आयुक्त.
सर्व आयुक्त महानगरपालिका.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
सर्व अधिकारी, महिला व बाल विकास विभाग.
मा. मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव.
मा. उप मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव.
मा. मंत्री (महिला व बाल विकास) यांचे खाजगी सचिव.
मा. राज्यमंत्री (महिला व बाल विकास) यांचे खाजगी सचिव.
~~सर्व महानगरपालिका.~~
निवड नस्ती, का-३

C.3' Yogita